# ग्लंडाचा प्रश्नोत्तररूप

## संक्षिप्त

# इतिहास.



याचें भाषांतर

रामचंद्र विनायक रणजित

यांणीं केलें

ते

मुंबई

गजन प्रेसांत छापलें

१८७०

किंमत तीन आणे

# इंग्लंड देशाचा इतिहास.

प्रश्न. ग्रेट ब्रिटन हें काय आहे?

उत्तर. हें एक बेट आहे.

प्र. बेट ह्मणजे काय?

उ. पाण्यानें वेष्टिल जी जमिन ती होय.

प्र. ह्यास ब्रिटन असें ह्मणण्याचें काय कारण?

उ. तेथील रह्मणारे लोकांवरून.

प्र. असें कां?

उ. ब्रिटन ह्मणजे रंगलेले लोक.

प्र. ही गोष्ट ब्रिटन मधल्या लोकांस कशि लागु होती?

उ. कारण ते आपलीं आंगे निळीं रंगवित.

प्र. ब्रिटन देशाचा पहीला वृत्तांत आपणास कोणापासून मिळतो?

उ. रोमन लोकांपासून.

प्र. रोमन लोक कोण होते?

उ. त्यानि पूर्वी बहुतेक पृथ्विचें राज्य केलें ते मोठे पराक्रमी लोक होते.

प्र. त्यांनीं ब्रिटन लोकांस जिंकलें कीं काय ?

उ. नाहीं, परंतु त्यांनीं हें बेट हस्तगत करून घेतलें.

प्र. केव्हां ?

उ. ख्रिस्त जन्मण्याच्या पुर्वी ५५ वर्षे.

प्र. त्यांच्या सरदाराचें नाव काय होतें ?

उ. जुलियस सिझर.

प्र. रोमन लोकांनीं सर्व बेट जिंकलें काय ?

उ. नाहीं. मुख्यत्वें इंग्लंड देश जिंकिला ; स्कॉटलंड अथवा उत्तर ब्रिटन जिंकलें नव्हतें.

प्र. त्याकाळीं ब्रिटन लोक कोणत्या स्थितींत होते ?

उ. क्रूर, अशिक्षित रानटी अवस्थेंत होते.

प्र. त्यांनीं शहरें वसविलीं होतीं काय ?

उ. थोडया मातीच्या झोंपडयानी वसलेल्या प्रदेशास ते शहर समजत.

प्र. ते काय उद्योग करीत ?

उ. पारधीचा आणि मासे मारण्याचा.

प्र. ते व्यापार करीत नव्हते काय ?

उ. होय ते गॉल्स लोकांबरोबर व्यापार चालवीत असत.

प्र. गॉल्स लोक कोण होते ?

उ. ते फ्रान्स देशांतील लोक होते.

प्र. ते कशाचा व्यापार करीत असत ?

उ. कॉर्नवाल एथीक खाणींत जें कथील सांपडे त्याचा ते व्यापार करीत.

प्र. ते कोणत्या धर्मानें चालत ?

उ. ते ड्रुइड यांच्या धर्मानें चालत.

प्र. ड्रुइड लोक कोण होते ?

उ. ते यांचे धर्मोपदेशक आणि उपाध्याय होते.

प्र. ड्रुइड या शब्दाचा अर्थ काय ?

उ. ओक या झाडास प्राचिनब्रिटिश भाषेंत ड्रुइड अशी संज्ञा होती यावरून हा शब्द निघाला.

प्र. त्याचें कारण काय ?

उ. कारण कीं ते ओक झाडास पवित्र मानीत.

प्र. ते कोणाची पुजा करीत ?

उ. सूर्य, चंद्र, तारे आणि अग्नि यांची.

प्र. त्यांची देवळें कशीं होती ?

उ. त्यांची देवळें अवडखोबड दगडांनीं वाटसरी बांधली होतीं.

प्र. त्यांतील अद्यापी कांहीं आहेत काय ?

उ. उईल्टशायर मध्ये स्टोनहेंज नावाचें एक अजुन राहिलें आहे.

प्र. ड्रुइड लोक बळीदान देत असत काय ?

उ. होय ते पुरुष, बायका आणि मुलांचे बळी देत.

प्र. ते लोक काय खात असत ?

उ. मांस, दुध आणि ओक झाडाचीं फळें.

प्र. जेव्हां रोमन लोक किनाऱ्यावर आले तेव्हां ब्रिटन लोकांनीं त्यास अडथळा केला नाहीं काय?

[ हटले. ]

उ. होय, ते अती शौर्यानें लढले खरे परंतु शेवटीं

प्र. रोमन लोक कोठे उतरले ?

उ. डोव्हर जवळ.

प्र. ब्रिटनबेट रोमन लोकांच्या ताब्यांत किती वर्षें राहिलें?

उ. सुमारे ५०० वर्षें.

प्र. त्यांहीं त्या देशाचें नाव बदललें नाहीं काय ?

उ. होय, त्यांहीं त्या देशास तेथील पांढऱ्या टेकऱ्यावरून आलबन हें नाव दिलें.

प्र. रोमन लोकांच्या कारकीर्दींत काय झालें ?

उ. पुष्कळ लढाया व रक्तश्राव झाले.

प्र. रोमन लोकांच्या राज्यांस ब्रिटन लोकांनीं अडथळा केला काय ?

उ. होय, त्यांनीं वारंवार केला, परंतु त्यांचा जय झाला नाहीं.

प्र. त्यांचे पुढारी कोण होते ?

उ. क्यारेक्टेकस नावाचा ब्रिटीश राजपुत्र होता

प्र. त्यानें कायकाय केलें?

उ. रोमन लोकांस त्याणें पुष्कळ वेळां हरविलें.

प्र पुढें त्याचें काय झालें?

उ. सरते शेवटीं तो धरलागेला आणि बंदीवान करून रोम शहरास पाठविला.

प्र. ब्रिटन लोकांस दुसरा सरदार कोण मिळाला?

उ. त्यांस बोआडीसिया नामक कुलीन ब्रीटीस राणी मिळाली.

प्र. तीणें केलेल्या हल्लयांत तीचा जय झाला काय?

उ. होय तीनें लंडन शहर जाळीलें आणि रोमन लोकांचा पराभव केला.

प्र. रोमन लोकांनीं तीचा क्रूर रीतीनें छळ केला काय?

उ. होय त्यांहीं प्रसिद्धपणें तीस फटके दिले.

प्र. पुढें तीचें काय झालें?

उ. शेवटीं क्यारेक्टेकसा प्रमाणें ती जिंकली गेली.

प्र. ती रोमन लोकांच्या हातीं सांपडली काय?

उ. नाहीं, ती विष खावून मेली.

प्र. ब्रिटन देश रोमन लोकांनीं कोणत्या वर्षीं सोडला?

उ. ईसवी सन ४४० सांत.

प्र. पुन्हा ब्रिटन लोकांनीं आपल्या देशांत राज्य केलेंकाय?

उ. नाहीं, राज व लढाई करण्याचा त्यांस सहवास नव्ह- ता, ह्मणून ते दोहतून एकहीं काम करण्यास अशक्त झाले.

प्र. त्यांस शत्रु होते काय?

उ. होय, त्यांचे बेटाच्या उत्तरेकडील लोकांनीं त्यांज बरोबर लढाई केली.

प्र. हे कोण लोक होते?

उ. पिक्टस् आणि स्कॉटस्.

प्र. त्या समयीं ब्रिटन लोक कसे वागले?

उ. त्यांनीं रोमन लोकांची मदत मागितली.

प्र. रोमन लोकांनीं त्यांस मदत केली काय?

उ. होय, एकदोनदां त्यांनीं मदत केली व शत्रूंस दुर ठेवण्याकरितां एक भिंत बांधिली.

प्र. त्या भिंतीचा कांहीं भाग अद्यापी आहे काय?

उ. होय, त्या भिंतीचे कांहीं भाग अजून आदळतात.

प्र. रोमन लोक मदत करिनातसे झाले तेव्हां ब्रिटन लोकांनीं काय केलें?

उ. मदती करितां त्यांनीं साक्सन् लोकांची प्रार्थना केली.

प्र. साक्सन् लोक कोण होते?

उ. ते जर्मनी देशाच्या उत्तरेकडील रहाणारे लोक होते.

प्र. साक्सन् लोकांनीं त्यांस मदत केली काय ?

उ. होय, त्या कारणास्तव ते ब्रिटन देशांत आले.

प्र. तेव्हां त्यांचा सरदार कोण होता ?

उ. त्यांचा राजपुत्र हेंजिष्ट हा होता.

प्र. पिक्टस् व स्कॉटस् लोकांचा पराभव झाला काय ?

उ. होय झाला, परंतु साक्सन् लोकांनींहीं ब्रिटन लोकांचा पराजय करून त्यांचा देश बळकावून बसले.

प्र. त्या लोकांनीं तो देश आपणांत वाटला काय ?

उ. त्यांनीं त्यांचीं सात राज्यें केलीं.

प्र. त्यांस काय ह्मणतात ?

उ. त्यास राज्य सप्तक ह्मणतात.

प्र. साक्सन् लोकांचा कोणता धर्म होता ?

उ. ते मूर्ति पूजक होते.

प्र. आपल्या आठवड्यांच्या दिवसांचीं नांवें त्यांच्या मूर्ति पूजेवरून निघालीं नाहींत काय ?

उ. होय, रवी–वार इंदु–वार आणि तसेंच दुसरे.

प्र. ब्रिटन देशास साक्सन् लोकांनीं काय नाव दिलें ?

उ. इंग्लंड असें दिलें.

प्र. हें राज्य सप्तक कोठपर्यंत चाललें ?

उ. इसवी सन ८२७ पर्यंत.

प्र. त्या नंतर काय झालें ?

उ. त्या पैकीं एगबर्ट नावाच्या एका राज्यानें सर्वांस जिंकीलें व आपण येकटाच त्या सर्वांचा राजा झाला.

प्र. ह्या प्रकारें राज चाललें काय ?

उ. होय, त्या प्रमाणें अजून चालत आहे.

प्र. आलफ्रेड धग्रेट कोण होता ?

उ. साक्सन् राजा होता.

प्र. तो केंव्हां पासून राज्य करूं लागला ?

उ. इसवी सन ८६१ष्ट पासून.

प्र. त्या राज्यांत स्वस्थता होती काय ?

उ. नाहीं, त्या राज्यास डेन्स् लोकांनीं उपद्रव दिला.

प्र. डेन्स् कोण होते ?

उ. डेन्मार्कचे लोक ज्यांनीं पूर्वीं इंग्लंड देशावर स्वारी केली होती.

प्र. त्यांनीं आलफ्रेड यास जिंकीलें काय ?

उ. होय, परंतु थोडा वेळ.

प्र. आलफ्रेड आपल्या पराक्रमा प्रमाणें चांगल्या स्वभावाचा होता काय ?

उ. होय, त्याच्याच चातुर्यामुळें आणि शहाणपणामुळें आमचें कल्याण झालें.

प्र. त्याने किती वर्षें राज केलें ?

उ. २९ वर्षें.

प्र. डेन्स् लोक साक्सन् लोकांस त्रास देत होतें काय ?

उ. होय, स्वेन राज्याच्या कारकिर्दी पर्यंत तसेंच चालविलें होतें.

प्र. स्वेन कोण होता ?

उ. तो डेन्मार्क देशचा-राजा होता.

प्र. त्यानें काय काय केलें ?

उ. त्यानें साक्सन् लोकांस जिंकीलें व देश आपल्या स्वाधिन करून घेतला.

प्र. हें केव्हां घडलें ?

उ. इसवी सन १०१७ त.

प्र. त्या नंतर कोण गादीवर बसला ?

उ- क्यानूट धीग्रेट.

प्र. त्याची वर्तणूक कशी होती ?

उ. तो शांत आणि निरभिमान होता.

प्र. त्यानें किती वर्षें राज केलें ?

उ. १८ वर्षें.

प्र. पुन्हां ती गादी साक्सन् लोकांस मिळाली कीं काय ?

उ. होय, ती एडवर्ड धी कंफेसरास मिळाली.

प्र. ह्या राजास कफेसर असें कां ह्मणतात.

उ. तो राज्यापेक्षां धर्मोपदेशकाचें काम फार पाही.

प्र. त्यानें किती वर्षें राज्य केलें ?

उ. २६ वर्षें.

प्र. त्या नंतर गादीवर कोण बसला ?

उ. हेरल्ड नावाचा राजपुत्र.

प्र. हेरल्ड यानें पुष्कळ वर्षें राज केलें काय?

उ. नाहीं, फ्रांन्स देशांतलि नार्मंडी प्रांताचा ड्युक उलीयम गादीसंबंधी वारसा सांगु लागला.

प्र. कोणत्या आधारावरून ?

उ. तो ह्मणाला कीं एडवर्ड याणें मरतेसमयीं आपल्या मृत्युपत्रात मला राज देण्याविषयीं लिहून ठेवीलें होतें.

प्र. तो त्या गादीचा आधिकार मिळविण्याविशी कसा गेला ?

उ. त्याणें पुष्कळ लष्कर घेऊन इंग्लंडावर स्वारी केली.

प्र. त्यांत त्यास जय कीतपत मिळाला ?

उ. त्यांत त्यास सर्वस्वि जय मिळाला.

प्र. ह्या विजयास काय ह्मणतात ?

उ. त्यास नार्मन लोकांचा विजय ह्मणतात. [काय?]

प्र. इंग्लंडच्या इतिहासांत हें वृत्त मोठ्या महत्वाचें आहे

उ. त्या इतिहासांत जीं जीं मोठीं कर्मे घडलीं त्यापैकीं हें एक होय.

प्र. कां असें ?

उ. इंग्लीश लोकांच्या राजवंशांत, कायद्यांत व रितीभातींत त्या काळापासून मोठा फेरफार झाला.

प्र. तो दिवस सांगा ?

उ. इसवी सन १०६६ इ.

प्र. हें युद्ध कोठें झालें ?

उ. हेस्टिंग्स् जवळ.

प्र. हा नवा राजा लंडन शहरावर चालून गेला काय?

उ. होय, आणि तो येतांच लोक त्याच्या स्वाधिन झाले.

प्र. त्यानें साऊथवार्क् शहर जाळलें नाहीं काय ?

उ. होय, आणि इंग्लीश लोकांस भय दाखविण्या करितां दुसरींही पुष्कळ गांवे जाळलीं.

प्र. त्यानें प्रथमतः कोणती इमारत बांधली ?

उ. लंडनचा बुरुज.

प्र. त्याला राज्याभिषेक केव्हां झाला ?

उ. क्रिस्तमसाच्या दिवशीं इसवी सन १०६६ यांत.

प्र. कोठें ?

उ. वेस्टमिनीस्टर या ठिकाणी.

प्र. तो आपल्या नव्या प्रजेबरोबर कसा वागला ?

उ. प्रथमता तो ममतेनें वागला नंतर जुलम करू लागला.

प्र. असा फेरफार कां झाला ?

उ. एका बंडावरून.

प्र. डुम्सडेबुक ह्मणून काय होतें

उ. त्यांत सर्व जमिनी संबंधी वर्णन होतें.

प्र. तें जयमानाच्या कारकिर्दींत झालें नाहीं काय

उ.. होय, तें त्याच्या हुकूमावरूनच केलें होतें.

प्र. तें आजून राखून ठेविलें आहे काय ?

उ. तें अद्यापी लंडनच्या बुरूजांत आहे.

प्र. त्या राज्यानें दुसरें काय केलें ?

उ. त्यानें करफीयु घांटा वाजविण्याची प्रघात घातली.

प्र. कशाकरीतां ?

उ. कि. ती वाजतांच सर्व लोकांनीं आपल्या घरांतिल विस्तव व दिवे विझवावें ह्मणून.

प्र. ती केव्हां वाजत असे ?

उ. रात्रीस आंठवाजतां.

प्र. ह्यामपूशायर एथील नॅव्हु फारेस्ट नवें अरण्य त्यानें स्थापन केलें कीं काय ?

उ. होय, ते करण्याकरितां शहरें व देऊळें मोडिली.

प्र. ह्या राज्यानें किती वर्षें राज्य केलें ?

उ. २१ वर्षें.

प्र. तो कोठें मेला ?

उ. तो फ्रान्स देशांत घोडयावरून पडल्यामुळें मरण पावला.

प्र. तेव्हां त्याचें वय कीती होतें ?

उ. ६३ वर्षांचें.

प्र. तो कोठच्या सालीं मेला ?

उ. इसवी सन १०८७ सीं ह्या सालीं.

प्र. त्याच्या नंतर गादीवर कोण बसला ?

उ. त्याचा मुलगा उयलीयम रूफस्.

प्र. त्याला रूफस् कां ह्मणत ?

उ. याच्या लाल केशांवरून.

प्र. त्याच्या राज्यांत कायकाय झालें ?

उ. त्याच्या राज्यांत मुख्य गोष्ट ही कीं कृसेड या नावाच्या लढाईस प्रारंभ झाला.

प्र. कृसेड लढाई ह्मणजे काय ?

उ. क्रिस्ती सरदार पालेस्टाईन येथें जाणऱ्या यात्रेकरांस संभाळण्यास, आणि येसुचें थडगें स्वाधिन करून घेण्यास, लढाई करण्यासाठीं गेले.

प्र. असें घडण्याचें कारण काय?

उ. जेरुसलमास यात्रेस जाणे पूर्वी धर्म असें मानित व जे कोण यात्रेकरू जात त्यांचे तुर्क लोक हाल करीत.

प्र. ह्या यात्रेकरांच्या सांभाळाकरितां लढाईचा प्रारंभ झाला काय ?

उ. होय, ह्याकरितां आणि तुर्क लोकांस हाकुनलावेण्याकरितां ह्या लढाईचा प्रारंभ झाला.

प्र. ह्या मसलतीस पुष्कळ लोक सामील झाले काय?

उ. होय, त्यांत हजारों शिरले आणि सर्व प्रतीचें क्रीस्तीही शिरले.

प्र. ह्यांत इंग्लीशांचाच संबंध होता काय ?

उ. नाहीं, ह्यांत फ्रेंच, जर्मन आणि इटालियन लोकही शिरले.

प्र. वुइलियम रूफूसनें कितीं वर्षें राज्य केलें ?

उ. १३ वर्षें.

प्र. तो कसा मेला ?

उ. नींवु फारेस्ट मधें त्यास तीर लागुन तो मेला.

प्र. त्यास तो तीर कोणीं मारिला ?

उ. सरवॉल्टर टीरेल या नावच्या गृहस्थानें.

प्र. त्यानें हा तीर समजुन उमजुन मारिला कींवा तो अकस्मात लागला ?

उ. त्या विषयीं बरोबर समजलें नाहीं.

प्र. हें केव्हां घडलें ?

उ. सन इसवी ११०० शांत.

प्र. त्याच्या नंतर गादीवर कोण बसला ?

उ. त्याचा भाऊ पहिला हेनरी.

प्र. तो खरा वारस होता काय ?

उ. नाहीं, त्यानें ती गादी जुलमानें बळकाविली.

प्र. तर खरा वारस कोण होता ?

उ. त्याचा वडिल भाउ रॉबर्ट.

प्र. तो कोठें होता ?

उ. पालेस्टाईन येथें क्रुसेडर लोकांबरोबर होता.

प्र. हा नवा राजा लोकांस आवडत असे काय ?

उ. होय, त्यानें पुष्कळ जुनें वाईट कायदे काढून त्यांच्या ठिकाणीं चांगले चालू केले.

प्र. तेथुन परत आल्यावर रॉबर्टानें या राज्यावर आपला वारसा सांगितला कीं काय ?

उ. होय, आणि लढायाही झाल्या.

प्र. त्याचा परिणाम काय झाला ?

उ. रॉबर्ट पास कैद केला आणि तो तुरुंगातच मेला.

प्र. त्याचे डोळे काढिले होते असें लोक ह्मणतातना ?

उ. होय, तें खरें आणि ते हेनरीच्या हुकुमानें काढिले.

प्र. त्याला कांहीं मुले होतीं काय ?

उ. होय, एक मुलगा व दोन मुली.

प्र. त्याच्या मुलांचें काय झालें.

उ. त्याचा एक मुलगा व मुलगी बुडून मेलीं.

प्र. दुसऱ्या मुलीचें नाव काय होतें ?

उ. म्याटिलडा.

प्र. हेनरीनें कितीं वर्षे राज्य केलें ?

उ. पस्तीस वर्षे पर्यंत.

प्र. तो कशानें मेला ? [मेला.]

उ. आपला आवडता पदार्थ अतिशय खाल्ल्यामुळे तो

प्र. तेव्हां त्याचें वय कीतीं होतें ?

उ. ६७ ष्ट वर्षांचे.

प्र. तो कोठल्या वर्षी मेला ?

उ. ११३५ सांत.

प्र. त्या नंतर कोण राज्यकरूं लागला ?

उ. त्याचा पुतण्या स्टिफन् ह्यानें राज्य बळकावीलें.

प्र. तर तें राज्य वास्तविक कोणाचें होतें ?

उ. हेनरीची मुलगी म्याटिलडा हिचें.

प्र. लोक स्टीफनास अनुकूळ होते काय ?

उ. होय, म्याटिलडा गर्विष्ट होती आणि स्टीफन् दयाळू होता.

प्र. तो गादी मिळावी ह्मणून म्याटिल्डा हिनें यत्न केला काय ?

उ. होय, ह्यापासून लोकांच्या आपआपसांत मोठ्या लढाया उत्पन्न झाल्या.

प्र. आपसांत लढाई होणें ह्याचा अर्थ काय ?

उ. एकाच देशांतिल लोकांत आंतल्याआंत लढाई होणें ह्यांस आपसांत लढाई ह्मणतात.

प्र. ह्यांत कोणाचा जय झाला ?

उ. स्टीफन्याचा.

प्र. त्यानें कितीं वर्षें राज्य केलें.

उ. १९ वर्षें.

प्र. तो केव्हां मेला ?

उ. ११५४ नांत.

प्र. त्याच्या नंतर कोण गादीवर बसला ?

उ. म्याटिल्डा हिचा मुलगा दुसरा हेनरी.

प्र. हें कसें घडलें ?

उ. स्टीफन मरण्यापूर्वींच अशी योजनाकरून ठेविली होती

प्र. हेनरीचा सर्व लोकांनीं आनंदपूर्वक सत्कार केला होता काय ? [केलें.]

उ. होय, सर्व प्रतीच्या लोकांनीं त्याला आनंदानें मान्य

प्र. त्याच्या आंगी तेव्हडी योग्यता होती काय ?

उ. होय, ज्या वाइट गोष्टींमुळें लोकांस विपत्ति भोगावी लागे ती कमी करण्यास त्याणें फारच मेहेनत घेतली आणि पुष्कळ चांगले कायदे केले.

प्र. त्याचा मंत्री कोण होता ?

उ. टॉमस ऑबेकेट.

प्र. ऑबेकेट हा कोण होता?

उ. तो शिपाई असून पुढें धर्मोपदेशक झाला आणि क्यांन्टरबरीच्या आर्चबिशप ह्या पदवीस चढला.

प्र. तो राजाच्या मर्जीतला होता काय ?

उ. होय, पहिल्यानें कांहीं वेळपर्यंत त्यांचें सख्यत्व होतें नंतर त्यांत मोठें वैर उत्पन्न झालें.

प्र. तें कां ?

उ. ह्या धर्मोपदेशकाच्या वर्तणूकमिळें राज्यास राग आला.

प्र. ह्याचा परिणाम काय झाला ?

उ. क्यांटरबरीएथें त्या धर्मोपदेशकास ठार मारला.

प्र. त्या पासून काय निष्पन्न झालें ?

उ. राजावर दोष आला व त्यानें प्रायश्चित्त घेतलें.

प्र. तें कसें ?

उ. त्यानें धर्मोपदेशकापासून शिक्षा सोशिली..

प्र. हेनरी यशस्वी योद्धा होता काय ?

उ. होय होता, ह्याच्या अमलांत इंग्लिश लोकांनीं आयर्लंड जिंकीलें.

प्र. तो कोणात्या वर्षीं मेला ?

उ. सन ११८९ दांत.

प्र. त्याच्या मागून कोण आला ?

उ. त्याचा जेष्ट पुत्र पहिला रिच्यर्ड.

प्र. रिच्यर्डास दुसरें नाव नव्हतें काय?

उ. होय, लोक त्यास सिंव्हांची उपमा देत.

प्र. ती कां ?

उ. त्याचें धैर्य आणि पराक्रम यांवरून.

प्र. त्याणें आपला पराक्रम कोठें प्रगट केला ?

उ. प्यालस्टाईन येथें.

प्र. त्याचें अंग क्रूसेडमध्यें होतें कीं काय ?

उ. होय फ्रान्सच्या राज्याबरोबर.

प्र. तो इंग्लंडमध्यें नसतां राजकारभार कोण चालवित होता ?

उ. त्याचा भाऊ जॉन हा.

प्र. त्याणें टर्क लोकांस जीकलें कीं काय ?

उ. होय, त्याणें पुष्कळ लढाया जिंकील्या आणि क्रिस्ती लोकांस जरूसलेमात जाण्याविषयीं जी भीति होती ती नाहींशी केली.

प्र. हा राजा इंग्लंड एथें नसतां तेथें काय झालें ?

उ. ज्यॉनानें राज्य घेण्याचा यत्न केला.

प्र. या हेनरी राज्यानें कितीं वर्षें राज्य केलें ?

उ. दहा वर्षें.

प्र. या पैकीं त्यांची इंग्लंडांत कितीं वर्षें गेलीं?

उ. पांच महिनें.

प्र. त्याला कसा मारला?

उ. त्याला एका तरिंदाजानें तरि मारला.

प्र. कोठल्या वर्षीं ?

उ. सन ११९९ वांत.

प्र. त्या नंतर दुसरा राजा कोण झाला ?

उ. जॉन.

प्र. त्याला दुसरें नांव नव्हतें काय?

उ. त्याला थट्टेनें "ल्याकल्यांड" ह्मणत.

प्र. तो कोण होता ?

उ. दुसऱ्या हेनरी राज्याचा दुसरा मुलगा.

प्र. तो खरा वारस होता काय ? [ होतें. ]

उ. नाहीं, तें राज्य त्याचा पुतण्या ऑरथर राजपुत्र ह्याचें

प्र. मग ह्या राजपुत्राचें काय झालें ?

उ. त्याला नदींत ठेऊन मारून टाकला.

प्र. जॉन लोकांस प्रिय होता कीं काय ?

उ. नाहीं, सर्व प्रतिचे लोक त्याचा तिरस्कार करीत.

प्र. धर्मोपदेशकासहीं असेंच वाटत होतें काय ?

उ. होय, त्यानें त्यां बरोबर तंटा केल्यामुळें त्यावर पोप रागें भरला.

प्र. पोप तो कोण ?

उ. रोमन क्याथलीक नामक क्रिस्ती धर्माचा मुख्य.

प्र. ह्याचा परिणाम काय झाला ?

उ. सर्व देवळें बंद केलीं आणि राज्यास आणि देशास श्राप दिला.

प्र. याचा शेवट कसा काय झाला ?

उ. जॉनास पोपाला राज्य द्यावें लागलें व धर्मोपदेशकांबरोबर सल्ला करावा लागला.

प्र. कोणत्या गोष्टी विषयीं याचें राज्य प्रख्यात आहे.

उ. ह्याच्या राज्यांत म्याग्नाच्यार्टावर सही केली.

प्र. ह्यावर सही कोणी केली ?

उ. जॉन राज्यानें सन १२१५ च्या १५ वे जूनच्या दिवशीं सही केली.

प्र. म्याग्न्याच्यार्टा ह्मणजे काय ?

उ. त्याचा अर्थ, मोठा कागद आणि ह्या मुळेंच इंग्लंड देशांतील लोकांस सुट मिळाली.

प्र. जॉनानें ह्या कागदावर संतोषानें सही केली काय?

उ. नाहीं, त्याच्या दरबारी लोकांनी त्यावर सही करण्यास जुलूम केला.

प्र. त्यानें किती वर्षें राज केलें ?

उ. १७ वर्षें.

प्र. तो कशानें मेला ?

उ. वाटेल तीतकें खाल्या व पिल्ह्यामुळें तो मेला.

प्र. तो केव्हां मेला ?

उ. १२१६ व्यांत.

प्र. त्याच्या नंतर कोण गादीवर बसला ?

उ. त्याचा वडील मुलगा तिसरा हेनरी.

प्र. त्या राजपुत्राचें वय किती होतें ?

उ. ८ वर्षांचें.

प्र. त्याणें राज्य कसें चालविलें ?

उ. तो राज्य करण्यास योग्य होई पर्यंत एक कारभारी नेमला होता.

प्र. हा कारभारी कोण होता ?

उ. पेंब्रोक प्रांताचा अर्ल.

प्र. हेनरी राज्यकरित असतां तो कसा वागला ?

उ. राजे जसें मुर्खपणानें वागतात तसा वागला.

प्र. तो कसा ?

उ. आपल्या मैत्रांकरितां त्यानें खजीन्यातील द्रव्य उडविलें, व प्रजेविषयीं काळजी बाळगली नाहीं आणि निरर्थक लढाया चालविल्या.

प्र. ह्यापासून काय उत्पन्न झालें ?

उ. बंड उत्पन्न झालें, ह्यामूळें त्याचें राज्य गेलेंच असतें.

प्र. तो कोणत्या वर्षी मेला ?

उ. १२७२ रांत.

प्र. त्याच्या गादीवर कोण बसला ?

उ. पहिला एडवर्ड.

प्र. तो सीपाईगिरींत प्रख्यात नव्हता काय ?

उ. त्याचें शौर्य पूर्वेकडील लढाईंत दिसून आलें.

प्र. त्याणें कोणत्या लढाया मारल्या ?

उ. वेल्स व स्कॉट या लोकांबरोबर मुख्यत्वेकरून ज्या दोन लढाया झाल्या त्या.

प्र. त्यांत त्याचा जय झाला काय?

उ. होय, त्याणें सर्व वेल्सदेश हस्तगत केला.

प्र. तसाच स्कॉटलंडदेश घेतला काय ?

उ. होय थोडका वेळ पर्यंत, नंतर स्कॉट लोकांनीं त्याला आडथळा केला.

प्र. त्यांचे सरदार कोण होते ?

उ. उलीयमवॉलेस आणि रॉबर्टब्रुस हे होते.

प्र. त्यानें किती वर्षें राज्य केलें ?

उ. ३९ वर्षें.

प्र. तो कोणत्या वर्षी मेला ?

उ. १३०७ तांत.

प्र. त्या नंतर कोण गादीवर बसला.

उ. त्याचा वडील मुलगा दुसरा एडवर्ड.

प्र. तो कसा वागला ?

उ. ढिल्या व निष्काळजीपणानें.

प्र. त्याची चाल लोकांस आवडत होती काय ?

उ. नाहीं, लोक त्याजविषयीं व त्याच्या मैत्राविषयीं कुरकुरत होते.

प्र. त्यानें स्कॉट लोकांबरोबर कांहीं लढाया केल्या काय ?

उ. होय त्यानें केल्या, परंतु त्यांत त्याचा पराभव झाला.

प्र. त्यानें किती वर्षें राज्य केलें ?

उ. २२ वर्षें व तो १३२७ त मेला.

प्र. तो कशानें मेला ?

उ. त्याच्या बायकोच्या हुकूमावरून त्याला जीवें मारला.

प्र. त्या नंतर कोण राजा झाला ?

उ. राज्याचा मुलगा तिसरा एडवर्ड.

प्र. त्यानें काय केलें ?

उ. त्याणें वयांत एतांच आपल्या बापाचा खून करणारास शिक्षा केली.

प्र. तो कोणत्या गोष्टीविषयीं कीर्तिमान होता ?

उ. शिपाईगिरीच्या कामांविषयीं.

प्र. त्याणें कोणत्या लढाया मारल्या ?

उ. त्यानें स्कॉटलड व फ्रान्स देशच्या लोकांबरोबर लढाई केली.

प्र. ह्यांत महत्वाची लढाई कोणती होती ?

उ. जी फ्रान्स देशाबरोबर केली होती ती.

प्र. ही लढाई करण्याचें कारण काय ?

उ. एडवर्डानें गादीवर हक्क लागू केला ह्मणून.

प्र. ह्यातील मुख्य लढाया कोणत्या त्या सांग ?

उ. क्रेसी व पोईकटीयर्सची.

प्र. प्रिन्स आव वेल्स ही पदवी पहिल्यानें कधीपासून चालू केली.

उ. एडवर्ड पहिला ह्यानें वेल्स देश जिंकील्या नंतर
ही पदवी राज्याच्या वडील मुलास मिळाली.

प्र. एडवर्ड राज्यानें इंग्लंडांत काय केलें ?

उ. त्यानें वुईंडसरकयासूल बांधला व ऑरडर ,आव
गार्टर ही पदवी उत्पन्न केली. [मेला ?],

प्र. त्यानें किती वर्षें राज्य केलें व तो कोठल्या सालीं

उ. त्याणें ५० वर्षें राज्य केलें व तो १३७७ रांत मेला

प्र. त्या नंतर गादीवर कोण बसला ?

उ. त्याचा नातु दुसरा रिच्यर्ड.

प्र. दुसरा रिच्यर्ड गादीवर बसला तेव्हां तो किती
वर्षांचा होता ?

उ. १७ वर्षांचा, व त्याच्या तीन काकांस राज्य
चालविण्यास नेमले होतें.

प्र. त्यानी काय केलें ?

उ. ज्यापासून लोकांस त्रास होईल तें आणि त्याचा
कंटाळा होईल तें केलें.

प्र. हें लोकांच्या ध्यानांत कसें आलें ?

उ. मनुष्यांवर कर चालू केला त्यामूळें वाटटीलरनें जें
बंड केलें त्यावरून.

प्र. मनुष्यावरील कर ह्मणजे काय ?

उ. राज्यांतिल प्रत्येक मनुष्यावर व स्त्रीवर एक शीलींग घेण्याचा कर.

प्र. ह्या बंडाचा शेवट कसा काय झाला ?

उ. कांहीं अशी जुलमानें व कांहीं अंशी समजुतीनें, हें बंड बंद केलें.

प्र. रिच्यर्ड कुशळ शीपाई होता काय ?

उ. तो दुष्ठ कर्मे करण्यांत व पोकळ डौल दाखविण्यात मात्र चतुर होता.

प्र. असें किती वेळ पर्यंत चाललें ?

उ. अशा प्रकारें त्यानें सुमारें २० वर्षे राज्य केलें.

प्र. त्याचा शेवट कसा झाला ?

उ. ह्याचा चुलतभाऊ ल्यांक्यास्टरचा डूक ज्यास ह्यानें हद्दपार केलें होतें तो परत येऊन त्याणें गादी बळकाविली.

प्र. ह्या वेळीं रिच्यर्ड कोठें होता ?

उ. आयर्लंडमध्यें.

प्र. त्यानें काय केलें ?

उ. सर्व नाहींसें होईपर्यंत त्यानें पैसे उधळले व सर्व ठिकाणीं फिरला.

प्र. नंतर काय झालें ?

उ. नंतर तो आपल्या चुलतभावाच्या हातीं सांपडला त्यानें त्यास सांगितलें कीं राज्य चांगलें चालविण्यास मदतकरण्यास मी आलों आहें.

प्र. तेव्हां राज्यानें त्यास काय उत्तर दिलें?

उ. माझ्या बांधवा ज्याअर्थी तुला असें चांगलें आवडतें तर मलाहीं आवडतें.

प्र. ह्या चुलतभावानें त्यापासून जुलमानें काय करून घेतलें ?

उ. राज्य तुला दिलें अशा कागदावर लेख करून घेतला.

प्र. दुसरें काय केलें ?

उ. मी बंदींत एकांतीं राहीन असें लिहून घेतलें. त्याला पॉम्फ्रेट किल्यांत जीवें मारला.

प्र. तो कोणत्या वर्षी ?

उ. १३९९ यांत.

प्र. त्याचा चुलतभाऊ त्याच्या मागाहून गादीवर बसला काय?

उ. होय, चौथा हेनरी या नावानें तो गादीवर बसला.

प्र. त्याच्या राज्यांत लढाईमूळें त्रास झाला काय?

उ. होय, स्कॉटस्, वेल्स आणि आयरीश लोक हत्यारें घेऊन त्यावर उठले.

प्र. त्याचा शेवट काय झाला ?

उ. वेल्स व आयरिश यास शरण जावें लागलें, परंतु स्कॉट लोक हटले नाहींत.

प्र. प्रिन्सहॅलविषयीं पुष्कळ सांगीतलें नाहीं काय ?

उ. प्रिन्स हेनरी हा राज्याचा मुलगा होता, हा क्रूर व अविचारी मनुष्य असून यानें चमत्कारिक कृत्यें केलीं.

प्र. त्यातून कांहीं सांग ?

उ. त्यानें नीच लोकांशी संगत ठेविली होती आणि कधींकधीं खजीना चोरीत असे.

प्र. चौथ्या हेनरीनें किती वर्षें राज्य केलें ?

उ. सुमारें चौदा वर्षें.

प्र. तो कोणत्या वर्षीं व तो कोठे मेला ?

उ. वेस्टमिनीस्टर एथें १४१३ त मेला.

प्र. त्याचा मुलगा गादीवर बसला काय ?

उ. होय, पांचवा हेनरी असें नाव मिळवून तो गादीवर बसला.

प्र. तो पहिल्याप्रमाणें आळशी आणि दंगेखोर होता काय ?

उ. नाहीं, त्याची वर्त्तणूक अगदीं बदलून गेली आणि तो लोकांस चांगला राजा वाटूं लागला.

प्र. तो मुख्यत्वेंकरून कोणत्या गोष्टीविषयीं प्रख्यात होता?

उ. युद्ध कौशल्य आणि धैर्य.

प्र. त्यानें कोणाबरोबर लढाई केली?

उ. फ्रेन्च लोकांबरोबर.

प्र. त्यास एकादा मोठा जय प्राप्त झाला काय?

उ. होय, आजीनकोर्टाच्या लढाईंत.

प्र. त्या लढाईचा परिणाम काय झाला?

उ. त्यामूळें फ्रेन्च राजकन्येबरोबर हेनरीनें लग्न केलें.

प्र. त्यावेळीं फ्रान्स देशाचा राजा कोण होता?

उ. चार्लस–हा वेडा होता.

प्र. त्याविषयींचा करार काय ठरला?

उ. कीं राजकरता बादशाह मेल्या नंतर हेनरीनें राजा व्हावें.

प्र. लग्ना नंतर हेनरी कितीं वर्षें वांचला?

उ. फार महिने हीं नाहीं.

प्र. तो कोणत्या वर्षी मेला?

उ. १४२२ सांत.

प्र. त्या नंतर गादीवर कोण बसला?

उ. त्याचा ९ महिन्याचा मुलगा सहावा हेनरी.

प्र. फ्रेन्च राजा कित्ती दिवस वांचला?

उ. इंग्लीश राज्याहेक्षां काहीं काळ जास्ति.

प्र. त्या नंतर सहावा हेनरी दोनी राज्याचा अधिपती झाला काय?

उ. होय, यांचे चुलते याचे पाळक झाले

प्र. तेव्हां काय घडलें ?

उ. फ्रान्स देशांत घोर युद्ध झालें.

प्र. त्या युद्धांतून काय निःष्पन्न झालें ?

उ. फान्स देशातून इंग्लिशाचा अधिकार नाहींसा झाला.

प्र. तेव्हां इंग्लंडांत काय झालें ?

उ. त्यावेळीं लोक फार नाखुश झाले.

प्र. ह्याचा शेवट काय झाला?

उ. यॉर्कच्या डूकनें गादीवर आपला हक्क लागू केला.

प्र. तो जय पावला काय ?

उ. नाहीं, पुष्कळ लढल्या नंतर तो मारला गेला.

प्र. त्याचा वारसा कोणी चालू केला ?

उ. त्याच्या मुलानें.

प्र. त्याचा आधिक जय झाला.काय ?

उ. होय, त्याला ती गादी मिळून चौथा एडवर्ड ही पदवी मिळाली.

प्र. सहाव्या हेनरींनें किती वर्षें राज्य केलें ?

उ. ३८ वर्षें.

प्र. चौथा एडवर्ड कोणत्या वर्षीं गादीवर बसला?

उ. १४६१ ष्टांत.

प्र. त्याचे राज्यांत कोणकोणत्या महत्वाच्या गोष्टी झाल्या?

उ. लढाया, रोगांच्यासाथ्या, आणि दुःष्काळ.

प्र. तेव्हां इंग्लंडांत लढाई झाली काय?

उ. होय, नव्या राज्याचे मीत्र आणि वैरी यांत.

प्र. ह्या लढाईला काय ह्मणतात?

उ. ह्यालढाईला, रोझसिची लढाई ह्मणतात:

प्र. अशीं कां ह्मणतात?

उ. कारण कीं एकाबाजूच्या लोकांनीं खुणेंकरित लाल गुलाबाचें फुल व दुसऱ्याबाजूच्या लोकांनीं पांढऱ्या गुलाबाचें फुल लाविलें होतें.

प्र. चौथ्या एडवर्डानें किती वर्षे राज्य केलें?

उ. २२ वर्षें.

प्र. ह्याच्या राज्यांत एकादि मोठी नवीन कल्पना निघाली काय?

उ. होय, छापण्याची कळा इंग्लंडांत आणिली.

प्र. त्याच्या नंतर कोण गादीवर बसला?

उ. त्याचा १२ वर्षांचा मुलगा पांचवा एडवर्ड-

प्र: कोणत्या वर्षीं?

उ. इसवी सन १४८३ साँत.
प्र. त्याणें किती वर्षें राज्य केलें ?
उ. दोन महिने आणि बारा दिवस.
प्र. त्याच्या मरणाचें कारण काय झालें ?
उ. त्याच्या काकाच्या हूकमावरून त्यास गुदमरून मारलें.
प्र. कोठचा काका ?
उ. ग्लास्टरचा डयूक रिच्यर्ड.
प्र. कोठें मारिलें ?
उ. लंडनच्या बुरंजांत.
प्र. कशाकरिता ?
उ. रिच्यर्डनें आपण राजा व्हावें ह्मणून.
प्र. तो गादीवर बसला काय ?
उ. होय, व त्याणें दोन वर्षें राज्य केलें.
प्र. त्याचे राज्याचा शेवट कसा झाला ?
उ. बोसवर्डच्या लढाईंत तो मेला त्याचबरोबर राज्याचा लय झाला.
प्र. ही लढाई कोणाबरोबर झाली.
उ. रिचमंडच्या अर्लानें जमविलेल्या फौजेचें बराबर.
प्र. त्या नंतर राजा कोण झाला ? [झाला.]
उ. सातवा हेनरी असें नाम धारणकरून रिचमंड राजा

प्र. त्याचा गादीवर काय वारसा होता ?

उ. तो ह्मणे कीं मी ३ र्‍या एडवर्डाचा वंशज आहे व ४ थ्या एडवर्डाच्या मुलीशीं लग्न केलें आणि राज्यासही जिंकीलें.

प्र. ह्यापासून काय नफा झाला ?

उ. रोझीसची लढाई बंद झाली.

प्र. त्या लढाइंत किती मेले असें ह्मणतात.

उ. एक लक्षापेक्षां जास्ती मनुष्यें मेली असावित.

प्र. ह्याच्या राजांत कोठची मोठी गोष्ट घडून आली?

उ. अमेरिका खंडाचा शोध लागला.

प्र. त्यानें किती वर्षें राज केलें ?

उ. २३ वर्षें.

प्र. त्याच्या नंतर कोण गादीवर बसला ?

उ. त्याचा मुलगा ८ वा हेनरी.

प्र. कोणत्या वर्षी ?

उ. १५०९ वांत.

प्र. त्यानें किती वर्षें राज केलें ?

उ. ३७ वर्षें.

प्र. तो राजकरित असतां मूख्य गोष्ट कोणती घडली ?

उ. सुधारणूक.

प्र. सुधारणूक ह्मणजे काय ?

उ. ह्या वेळा पूर्वी इंग्लंडचा देश रोमन क्याथलीक धर्मांचा होता ; ह्यानें पोपाचा निःशेढ्ढकरून प्रॉटस्टंट धर्म स्वीकारिला.

प्र. तो चांगला राजा होता काय ?

उ. नाहीं, तो क्रूर व जुलमी होता.

प्र. त्याचा मुख्य मंत्री कोण होता ?

उ. कार्डीनल वुलसी.

प्र. ह्या हेनरीने किती बायका केल्या ?

उ. सहा.

प्र. त्यांत पहिली कोणती ?

उ. आरागाँची क्याथराईन्, तिला त्यानें सोडचीटी दिली.

प्र. दुसरी कोण होती ?

उ. आनी बोलेन, हीस त्यानें ठार कारली.

प्र. तिसरी कोण होती ?

उ. जेन समोर, ही मुलगा होतांच वारली.

प्र. चौथी कोण होती ?

उ. ऑन ऑफक्लोवज् तिला त्यानें सोडली.

प्र. पांचवी कोण होती ?

उ. क्याथराईन हॉवर्ड तीस ठार मारली.

प्र. शेवटील कोण होती ?
उ. क्याथराईनपार ती विधवा झाली.
प्र. तो केव्हां मेला ?
उ. सन १५४७ साच्या २८ साव्या जानुआरीस.
प्र. त्याच्या नंतर गादीवर कोण बसला ?
उ. त्याचा १० वर्षांचा मुलगा ६ वा एडवर्ड.
प्र. त्याची वर्त्तणूक कशी होती ?
उ. तो दयाळू, धार्मीक आणि विद्वान होता.
प्र. तो प्रॉटस्टंट होता काय ?
उ. होय, आणि प्रॉटस्टंट धर्मास त्यानें फार उत्तेजन दिलें.
प्र. त्यानें किती वर्षें राज केलें व तो केव्हां मेला ?
उ. ६ वर्षें राज्य केलें आणि १५५३ नांत तो मेला.
प्र. त्या नंतर दुसरा राजा कोण झाला ?
उ. त्याची बहिण मेरी.
प्र. तिच्या वारस्याविषयीं तंटे पडले नव्हते काय ?
उ. होय, कारण कीं ती रोमन क्याथलीक होती.
प्र. लोकांच्या मनात कोणी राज्य करावें असें होतें ?
उ. जेन ग्रे नावाच्या स्त्रीयेनें.
प्र. हीला गादीची ईच्छा होती काय ?
उ. नाहीं, ती तें घेण्यास चपापली.

प्र. ते घेण्याविषयीं तिच्यावर जुलूम केला नाहीं काय

उ. होय, आणि तिनें १२ दिवस राज्य केलें.

प्र. नंतर काय झालें ?

उ. मेरी राणीची दुवाही फीरली, आणि जेनीस तुरंगांत घातली.

प्र. तिचें काय झालें ?

उ. तिला तिच्या नवऱ्या सहीत मारून टाकली.

प्र. मेरीचें राज कशाकरितां प्रख्यांत आहे?

उ. प्रॉटस्टंट लोकांस क्रूरपणानें त्रास दिला ह्या विषयीं.

प्र. मेरीनें किती वर्षे राज केलें व ति केव्हां मेली?

उ. तिनें पांच वर्षे, राज्य केले व ती १५५८नांत मेली.

प्र. तिच्या नंतर गादीवर कोण बसलें?

उ. तिची बहिण एलीझाबेथ.

प्र. तिनें पहिल्यानें काय केलें ?

उ. सुधारलेला धर्म पुन्हा स्थापिला.

प्र. ती लोकांस प्रिय होती काय ?

उ. होय, ते तीस "गुड कुईनबेस" असें ह्मणत.

प्र. तिच्या बरोबर स्पानीश लोकांनीं लढाई केली नाहीं काय ?

उ. होय तिच्या मयत बहीणीचा नवरा स्पेनचा फिलीप

ह्यानें केली.

प्र. त्याच्या आरमारास काय ह्मणत ?

उ. अजींक्य आरमार असें ह्मणत.

प्र. ह्या राणीनें लग्न केलें होतें काय?

उ. नाहीं, ती ह्मणे मी आपल्या लोकांसच वरीलें आहे.

प्र. ती कोणत्या वर्षीं मेली.

उ. १६०३ हींत.

प्र. तिच्या नंतर गादीवर कोण बसला ?

उ. पहिला जेम्स.

प्र. पहिला जेम्स कोण होता .

उ. स्कॉटलंड देशाचा राजा आणि ७ व्या हेनरीचा वंशज.

प्र. ह्याच्या राज्यांत पहिली महत्वाची गोष्ट कोणती झाली?

प्र. गंपौडर प्लॉट.

प्र. गंपौडर प्लॉट ह्मणजे काय ?

उ. पार्लमेंट, राजा, लॉर्डस् आणि कॉमन्स् लोकांच्या सभेस जाळून टाकण्याचा रोमन क्याथेलिक लोकांचा यत्न.

प्र. ह्यांत मुख्य कोण होता ?

उ. गायफॉक्स.

प्र. हा कट उघडकीस केव्हां आला ?

उ. १६०५ यांत नवेम्बरच्या ५ व्या तारिखेस.

प्र. दुसरें काय घडलें ?

उ. बायाबलाचें आतां आहे तसें भाषांतर इंग्लीश भाषेंत केलें.

प्र. कांहीं लढाया झाल्या काय ?

उ. काहीं सांगण्याजोग्या महत्वाच्या अशा नाहींत.

प्र. जेम्सनें किती वर्षे राज्य केलें ?

उ. २२ वर्षें.

प्र. त्याच्या नंतर गादीवर कोण बसला ?

उ. सन १६२५ सालं ह्याचा दुसरा मुलगा पहिला च्यार्लस् गादीवर बसला.

प्र. ह्याच्या राज्यांत काय झालें ?

उ. लोकांची आपआपसांत मोठी लढाई झाली.

प्र. ही लढाई कशी उत्पन्न झाली ?

उ. च्यार्लसनें कर चालू केलें, अन्यायानें इंग्लीश लोकांची मोकळीक बंदकरण्यास यत्नकरूं लागला परंतु त्याचा बेत सिद्धीस गेला नाहीं.

प्र. त्या लढाईत लढणारे लोक कोण होते ?

उ. राजा आणि पार्लमेंट.

प्र. ह्याचा शेवट कसा झाला ?

उ. राज्याचा पराभव झाला.

प्र. मग ह्याचा परिणाम काय झाला ?

उ. राज्याचा शिरच्छेद केला.

प्र. तेव्हां तेथील राज्य कसें चाललें ?

उ. एक दरबारी लोकांची मंडळी नेमून.

प्र. त्यांचा पुढारी कोण होता ?

उ. आलीवर क्रॉंवेल होता.

प्र. ह्या नंतर काय झालें ?

उ. क्रॉंवेलानें पार्लमेंट सभा मोडली.

प्र. मग काय झालें ?

उ. नंतर त्यास संरक्षक नेमला.

प्र. असें कोठपर्यंत चाललें ?

उ. १६५३ ना पर्यंत.

प्र. ह्याचा शेवट कसा झाला ?

उ. ऑलीवर क्रॉंवेलाच्या मृत्युबरोबर याचा अंत झाला.

प्र. त्याला मुलगे होते काय ?

उ. होय, चार होते.

प्र. त्यांतून कोणाएकास तरीं संरक्षक नेमिलें काय ?

उ. होय, बापाच्या मरणाच्या दुसऱ्या दिवशीं रिच्या-

र्डास नेमिलें.

प्र. रिच्यार्डानें चांगलें राज्य चालविलें काय ?

उ. नाहीं, तो लोकांच्या नाचविण्याप्रमाणें नाचे.

प्र. नंतर त्याचा शेवट कसा झाला?

उ. त्यानें त्या कामाचा राजीनामा दिला.

प्र. पुढें काय झालें ?

उ. माजी राजाचा मुलगा च्यार्लस् ह्यास परत बोलाविलें.

प्र. ह्या वेळीं च्यार्लस् कोठें होता ?

उ. इंग्लंडांतून पळून पारिस शहर एथें काहीं दिवस राहिला होता.

प्र. त्यानें बोलाविणें मान्य केलें काय ?

उ. होय, आणि १६६० च्या मे महिन्याच्या २६ व्या तारिखेस डोव्हर एथें येऊन उतरला.

प्र. दुसरा च्यार्लस याचे गुण कसे होते ?

उ. तो आनंदी, चेष्टाखोर आणि दुराचर्णी होता.

प्र. त्याला बहुदा काय ह्मणत ?

उ. आनंदी राजा.

प्र. त्याच्या राजांत कायकाय झालें ?

उ. १६६९ ष्टात लंडन शहरांत धाम आली.

प्र. त्यामुळें किती लोक मेले ?

उ. सुमारें लक्षावर.

प्र. मग दुसऱ्या वर्षी काय झालें ?

उ. लंडन शहरास मोठी आग लागली.

प्र. दुसऱ्या च्यार्लसनें किती वर्षें राज्य केलें ?

उ. २९ वर्षें.

प्र. तो केव्हां मेला ?

उ. १६८५ सांत ६ व्या फेब्रुआरिच्या दिवशीं.

प्र. त्या नंतर गादीवर कोण बसला ?

उ. त्याचा भाऊ दुसरा जेम्स.

प्र. लोकांची भक्ती त्यावर होती काय ?

उ. नाहीं, त्याच्या क्रूरपणामुळें लोकांस त्याचा त्रास आला.

प्र. त्यानें पहिल्यानें काय केलें ?

उ. रोमन क्याथलीक धर्म पुन्हा स्थापन करण्यास त्यानें यत्न केला.

प्र. तेव्हां लोकांनीं काय केलें ?

उ. ऑरेंजचा राजा उइल्यिम ह्यास मदतीस बोलाविलें.

प्र. हा राजा कोण होता ?

उ. राज्याचा जांवई होता.

प्र. असें कसें ?

उ. जेम्सच्या मेरी नावाच्या मुलीबरोबर त्याने लग्न केलें होतें.

प्र. त्यानें इंग्लीश लोकांस मदत केली काय ?।

उ. होय, तो १५०० मनुष्यें व ७० तारवांचें आरमार घेऊन आला.

प्र. तो केव्हां इंग्लंडांत आला ?

उ. सन १६८८ सांत नवेंम्बर महिन्याचे ५ व्या तारिखेस.

प्र. मग ?

उ. जेम्स राज्यातून पळाला आणि राज्य चालविण्यास आधिकारी नेमले.

प्र. त्या नंतर?

उ. उइलियमास राज घेण्यास बोलाविलें।

प्र. त्यानें तें घेतलें काय ?

उ. होय, बायको व आपण मिळून तें राज्य घेतलें.

प्र. ह्या वेळास इंग्लीश इतिहासांत काय ह्मणतात ?

उ. या राज्यास दुसऱ्या मेरीचें व तिसऱ्या उइलियमाचें राज्य ह्मणतात.

प्र. पुन्हा राज्य मिळावें ह्मणून जेम्स याणें यत्न केला कीं काय ?

उ. होय, त्यानें यत्न केला परंतु शेवटांस गेला नाहीं.

प्र. त्यानें मुख्यत्वें कोठें यत्न केला ?

उ. आयर्लंडामध्यें.

प्र. कोणत्या लढाईवरून ह्याचा निर्णय झाला?

उ. बोईन एथील लढाईवरून.

प्र. ह्या राज्यांत स्वस्थता होती काय ?

उ. असेंतर नव्हतें–परंतु सर्व राज्यभर लढाया चालल्या होत्या.

प्र. ह्या कोणासीं चालल्या होत्या ?

उ. फ्रान्स देशाचा राजा १४ वा लूई ह्याबरोबर.

प्र. उयलियमाचे राजांत काय स्थापित झालें ?

उ. इंग्लंडची पेढी ( ब्यांक ) स्थापित झाली.

प्र. मेरी आपल्या पतिच्या पूर्वीं मेली काय ?

उ. होय, आणि मग त्यानें एकट्यानेंच राज्य केलें.

प्र. तो कोणत्या वर्षीं मेला ?

उ. १७०२ हांत.

प्र. त्याच्या नंतर कोण गादीवर बसलें ?

उ. ऑन.

प्र. ऑन कोण होती ?

उ. दुसऱ्या जेम्सची दुसरी मुलगी.

प्र. तेव्हां हीच्या राज्यांत कायकाय झालें?

उ. तिच्या राज्याचा काळ फ्रान्स देशाबरोबर लढाई

करण्यात गेला.

प्र. इंग्लीश लोकांचा जय झाला काय ?

उ. होय, त्याचा बहूत वेळां जय झाला

प्र. त्याचा मुख्य सरदार कोण होता ?

उ. मार्लबरोचा डूक.

प्र. तेव्हां काय घडलें ?

उ. इंग्लंड आणि स्कॉटलंड हीं एकत्र झाली.

प्र. त्यास काय नाव दिलें ?

उ. ग्रेट ब्रिटन.

प्र. ऑन राणीस राज्य भ्रष्टकरण्यास कोणी यत्न केला होता काय ?

उ. होय, तिचा भाऊ दुसऱ्या जेम्सचा मुलगा ह्यानें.

प्र. ह्या राणीनें किती वर्षे राज्य केलें ?

उ. १२ वर्षें.

प्र. ती कोणत्या वर्षीं मेली ?

उ. १७१४ दांत.

उ. तिच्या गादीचा मालक कोण झाला ?

प्र. पहिला जॉर्ज.

प्र. पहिला जॉर्ज कोण होता ?

उ. तो ह्यानोवरचा राजा होता .

प्र. त्याचा गादीशीं कायदेवारसा होता ?

उ. तो पहिल्या जेम्सचा वंशज होता.

प्र. राणीच्या भावास राज्य न मिळण्याचें कारण काय ?

उ. रोमन क्याथलिकास राज्य करण्याचा हुकूम नव्हता.

प्र. त्याचा परिणाम काय झाला ?

उ. जॉर्ज नावाच्या प्राटस्टन्ट धर्मांच्या राजपुत्रास गादी मिळाली.

प्र. तो राज्य करूं लागला तेव्हां किती मोठा होता?

उ. ५५ वर्षांचा.

प्र. त्याचें राज्य कशाविषयी प्रख्यात होतें?

उ. दोन बंडांविषयी.

प्र. हीं बंडें कोणीं केलीं?

उ. दुसऱ्या जेम्सच्या मुलानें.

प्र. त्याला काय ह्मणत?

उ. खोटा वारसा सांगणारा.

प्र. त्यांचा जय झाला कीं काय?

उ. नाहीं, त्याचा पराभवच झाला.

प्र. पहिल्या जॉर्जानें किती वर्षें राज्य केलें?

उ. बारा वर्षें.

प्र. त्याच्या नंतर गादीवर कोण बसला?

उ. त्याचा मुलगा दुसरा जॉर्ज.

प्र. हा राज्य करीत असताना जुन्या राजकुटुंबानें आपला वारसा सांगुन त्रास मांडला नाहीं काय?

उ. होय, जेम्सच्या नातवानें गादीवर वारसा केला.

प्र. त्याला काय ह्मणत?

उ. खोटा वारसा सांगणारा तरून राजा.

प्र. त्यानें लढाई कोठे केली?

उ. स्कॉटलंडांत.

प्र. त्याचा जय झाला काय?

उ. नाहीं,—कुलोडेन येथें त्याचा मोड झाला.

प्र. दुसऱ्या जॉर्जानें किती वर्षें राज्य केलें?

उ. ३३ वर्षें.

प्र. त्याच्या नंतर कोण गादीवर बसला?

उ. त्याचा नातू ३रा जॉर्ज १७६०त गादीवर बसला.

प्र. त्याचें राज्यात स्वस्थता होती काय?

उ. नाहीं सर्व वेळ बहुधा लढायाच चालल्या होत्या.

प्र. दुसरी प्रख्यात गोष्ट काय झाली?

उ. अमेरिकेतील लढाई.

प्र. ह्या लढाईचें कारण काय?

उ. त्या लोकांनीं करदेणें नाकारिलें.

प्र. ह्याचा शेवट काय झाला?

उ. अमेरिका स्वतंत्र झाली.

प्र. ह्या शिवाय दुसरी मोठी गोष्ट काय झाली?

उ. फ्रेंचच्या राज्याची उलटा पालट.

प्र. त्याचा अर्थ काय?

उ. सोळाव्या लुईच्या विरुद्ध फ्रान्स देशच्या लोकांनीं बंड केलें.

प्र. त्यांचा जय झाला काय?

उ. त्यांचा अगदी जय झाला,––आपल्या राज्यकर्त्यांस त्यांनीं काढून टाकिलें.

प्र. नंतर काय झालें?

उ. राजा राणी आणि दुसऱ्या पुष्कळांस मारून टाकलें.

उ. त्या वेळचीं क्रूर कृत्यें भयंकर नव्हतीं काय?

प्र. होय त्यास भयाचें राज्य ह्मणतात.

प्र. फ्रान्सचा मुख्य राजकर्ता कोण झाला?

उ. नेपोलियन बोना पार्ट.

प्र. बोना पार्ट कोणत्या पदवीस चढला?

उ. पहिल्यानें त्याला कान्सलची पदवी मिळाली नंतर तो बादशाहा झाला.

प्र. ह्या फेरफाराच्या लढाईचा शेवट कसा काय झाला?

उ. वाटरलुच्या लढाईनें झाला.

प्र. ही लढाई केव्हां झाली?

उ. १८१५रात जून महिन्याच्या अठरावे तारखेस.

प्र. कोणत्या लोकांचा पराभव झाला?

उ. नेपोलियनाच्या लोकांचा.

प्र. बादशहाचें काय झालें?

उ. सेंट हेलेना बेटांत त्याला कैद करून पाठविला.

प्र. इंग्लंड देशाची त्या लढाईमुळें कीर्ती वढती झाली नाहीं काय?

उ. होय, जमिनीवर व समुद्रावर ही कीर्ती वढती झाली.

प्र. तिचे बुद्धीवान सरदार कोण होते?

उ. नेलसन् आणि वेलींगटन्.

प्र. तिसऱ्या जॉर्जानें किती वर्षे राज केलें?

उ. सुमारें ६० वर्षे.

प्र. त्या नंतर कोण गादीवर बसला?

उ. १८२०त प्रिन्स आफ वेल्स गादीवर बसला.

प्र. चौथा जॉर्ज जन प्रीय होता काय?

उ. थोडक्यांस मात्र तो प्रीय होता.

प्र. त्याला काय दोष लावीत?

उ. त्याची खासगी वर्तणूक.

प्र. दुसरे कांही आहे?

उ. त्याची बायको क्यारो लाईन राणी बरोबरची त्याची वाईट वर्तणूक.

प्र. त्याच्या राज्यांत मुख्य गोष्ट कोणती झाली?

उ. रोमन क्याथोलीक लोकांस पार्लमेंटांत बसण्याचा हुकूम दिला.

प्र. चौथ्या जॉर्जानें किती वर्षे राज्य केलें?

उ. दहा वर्षे.

प्र. तो कोणत्या वर्षी मेला?

उ. १८३०सांत.

प्र त्या नंतर कोण राजा झाला?

उ. चौथा उइलियम.

प्र. त्याच्या राज्यांत मुख्य गोष्ट कोणती झाली?

उ. पार्लमेंटांत सुधारणुक.

प्र. तो केव्हां मेला?

उ. १८३७सांत ज्यून महिन्याच्या २०व्या तारखेस.

प्र. त्याच्या नंतर गादीवर कोण बसलें?

उ. आपलि सर्वांची कृपाळू महाराणी साहेब.

प्र. तीचे आणि राज्याचें काय नातें होतें?

उ. ती राज्याची पुतणी होती.

प्र. ही कोणाची मुलगी?

उ. राजाचा भाऊ ड्यूक ऑफ् केंट ह्याची मुलगी.

प्र. राणीसाहेबांस राज्याभिषेक केव्हां झाला?

उ. १८३८सांत जून महिन्याच्या २८व्या तारखेस.

प्र. तीचे केव्हां लग्न झालें?

उ. १८४०सांत फेब्रुआरी महिन्याच्या १०व्या तारखेस.

प्र. ते कोणा बराबर?

उ. प्रिन्स आलबर्ट ह्याजबरोबर.

प्र. १८५१नांत काय झालें.

उ. मोठें प्रदर्शन.

प्र. तें त्याच वर्षी बंद झालें नाहीं काय?

उ. होय, परंतु सिडेन ह्याम येथें नवें व सुंदर घर बांधलें.

प्र. ते केव्हां उघडलें?

उ. १८५४नाचे जून महिन्यांत.

प्र. प्रदर्शनावरून आपणास काय बोध होतो?

उ. लोकांचें ऐक्य आणि मेहनतीची किंमत.

समाप्त.